१०४

20150422123133627

**खेड लघु पाटबंधारे योजना ता.इगतपूरी, जि.नाशिक सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.लपायो १४९७/९९६/(३३०/९७) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:-२१/६/२००६

पहावे:- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे दि.२/६/९७ चे पत्र क्रमांक उमप्र/तां-६/लपा/नाशिक/३०८८/सन ९७

प्रस्तावना:-

खेड लघु पाटबंधारे योजना, ता. इगतपूरी, जि. नाशिक या योजनेस शासन निर्णय, जलसंपदा विभाग, एमआयडब्ल्यू १५७४/१०३७२२/लपा-१, दि.१०/१/१९७५ अन्वये एकूण रु. २७.११ लक्ष रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर योजनेचे मुख्य धरणाचे काम जून १९८५ मध्ये पूर्ण करण्यात आले असून, मुख्य कालव्याचे काम १९८९-९० मध्ये पूर्ण करण्यात आले आहे. वर्ष १९९०-९१ पासून सिंचन सुरु आहे. मे १९९५ पासून सदर योजना नाशिक सिंचन व्यवस्थापनासाठी हस्तांतरित करण्यात आली आहे. या योजनेच्या उर्वरित कामासाठी ९५-९६ ची दरसूची वापरुन रु. १६३.१७ लक्ष किंमतीचा सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचेकडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासननिर्णय:-**

१) नाशिक जिल्ह्याच्या इगतपूरी तालुक्यातील खेड लघु पाटबंधारे योजनेस सन १९९५-९६ च्या दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित रु.१,६३,१७,११८/- (रुपये एक कोटी, त्रेसष्ट लक्ष, सतरा हजार एकशे अठरा फक्त) त्यापैकी रु. १,३४,३६,९७३/- कामाप्रित्यर्थ व रु. २८,८०,१४५/- अनुषंगिक खर्च) खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी क्रमांक आय-५ "४७०२ लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च -८०० इतर खर्च (१) बांधकामे सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (एक) पंचवार्षिक योजना", या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४३/२००१/१४६१, दिनांक ७/२/२००१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २४५/०६/व्यय-१२, दि. २६/४/२००६ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली सुधारीत प्रशासकीय मान्यता अ.क्र. ११ दर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( श्री. ए. केदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी अदांजाच्या गोषदा-यासह:-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
मुख्य अभियंता (द व प्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे मंडळ, नाशिक
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नाशिक
उपसचिव (लघु पाटबंधारे)/अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थशाखा (५ प्रती)/ लपा-१/लपा-२/निवसं-३, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, नाशिक
स्वीय सहायक, मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.म.वगळून), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी माहिती व जनसंपर्क, महासंचालनालयह, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ)

(दिनांक २१/६/२००६ चा शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. [illegible]/९९६ /(३३०/९७)/खारभूमी चे सहपत्र)

विवरणपत्र

अंदाजपत्रकाचा गोषवारा

खेड लघु पाटबंधारे योजना, ता. इगतपूरी, जि. नाशिक

| अ.क्र. | उपशीर्ष | एकूण |
|---|---|---|
| १ | ए-प्राथमिक | १५,००० |
| २ | बी-भूसंपादन | १६,४०,४५९ |
| ३ | सी-कामे | ३८,९६,२१६ |
| ४ | डी.-विमोचक | ८७,५७४ |
| ५ | इ-फॉल | |
| ६ | एफ-आर.एच.टी.कामे | |
| ७ | जी-पूल | |
| ८ | एच-एकस्पे | |
| ९ | के-इमारती | ५०,००० |
| १० | एल-मातीकाम | |
| ११ | एम-वृक्षरोपण | २५,००० |
| १२ | ओ-संकीर्ण | १५,००० |
| १३ | पी-देखभाल | ५०,००० |
| १४ | आर-दळणवळण | १,६८,२३६ |
| | **एकूण** | |
| | (III) व (III) कालवा व वितरिका | ७४,८९,४८८ |
| | **कामाप्रीत्यर्थ** | **१,३४,३६,९७३** |
| | अधिक अनुषंगिक खर्च २५.२५ टक्के (भूसंपादन वगळून) | २८,८०,१४५ |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | १,६३,१७,११८ |
| | | |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | ३७९७ स.घ.मी. |
| पाणीसाठयाची प्रति स.घ.मी.किंमत (रु.) | ४२९७ प्रति स.घ.मी. ( < रु. १७१०० (आर्थिक मापदंडात बसते.) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.५४ > १.०० (आर्थिक मापदंडात बसते.) |